जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना - निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः क्रीडायो-२३१८/प्र.क्र.२२१/क्रीयुसे-१,

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २४ जानेवारी, २०१९.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक-क्रीडाधो-३११३/(प्र.क्र.५५/१३)/ क्रीयुसे-३, दिनांक २२ मे, २०१४.

२) उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, शिवछत्रपती क्रीडापीठ, म्हाळुंगे-बालेवाडी, पुणे यांचे पत्र क्र.शिक्रीपी/तरतूद/क्रीप्रकें/निवि/२०१८-१९/का-१३/१२५४, दिनांक ११ डिसेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य क्रीडा क्षेत्रात अग्रगण्य रहावे, नागरिकांमध्ये व्यायामाची आवड जोपासावी, राज्यातील खेळाडूंनी राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय स्तरावर दर्जेदार कामगिरी करण्यासाठी क्रीडा विषयक तंत्रशुध्द प्रशिक्षण, खेळाच्या दर्जात सुधारणा, खेळाडूंना गौरव, दर्जेदार क्रीडा सुविधा या बाबी केंद्रबिंदू मानून खेळाडूंसाठी हितावह योजना राज्यात राबविण्यासाठी क्रीडा धोरण २०१२ तयार करण्यात आलेले आहे. त्याची अंमलबजावणी करण्याबाबत दिनांक १४.०६.२०१२ चा शासन निर्णय निर्गमित करण्यात आला आहे. त्यातील शिफारशीच्या अनुषंगाने राज्यातील क्रीडापटूंच्या गुणांना वाव मिळण्यासाठी प्रत्येक जिल्हयात प्रशिक्षणाच्या सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्र स्थापन करण्यास संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये शासन मान्यता देण्यात आली आहे. या योजनेसाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीपैकी रु.५०,८६,८००/- इतकी तरतूद ०६ जिल्हयांना वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना या योजनांतर्गत योजनेकरीता सन २०१८-१९ या वर्षाकरिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतूदीपैकी रु.५०,८६,८००/- ( रुपये पन्नास लाख शहाऐंशी हजार आठशे फक्त) इतकी तरतूद खालील विवरणामध्ये दर्शविल्यानुसार जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्रांना वितरीत करण्यास व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

**जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्र विभाग निहाय जिल्हयांची नावे**

| अ.क्र. | विभाग | जिल्हा | रक्कम रु. |
|---|---|---|---|
| १ | पुणे | पुणे | ९,०३,५००/- |
| २ | | सोलापूर | ६,१८,०००/- |
| ३ | लातूर | नांदेड | ७,४२,०००/- |
| ४ | नागपूर | वर्धा | १०,०५,५००/- |
| ५ | अमरावती | अकोला | ७,३३,५००/- |
| ६ | | बुलढाणा | १०,८४,३००/- |
| **एकूण रक्कम रु.** | | | **५०,८६,८००/-** |
| **(अक्षरी - एकूण रक्कम रुपये पन्नास लाख शहाऐंशी हजार आठशे फक्त )** | | | |

२. सन २०१८-१९ मध्ये जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना याकरीता उपलब्ध झालेल्या रु.४००.०० लक्ष एवढया तरतुदी मधून नमूद जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राना निधी वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा त्याच वेळी आंहरीत करावा. शासन लेख्याबाहेर बँक खात्यात हा निधी ठेऊ नये.

II. राज्य शासनामार्फत वेळोवेळी वित्त विषयक निर्गमित करण्यात आलेले विविध आदेश/नियम/ शासन निर्णय वित्तीय नियमावली यांची अंमलबजावणी करुन वरील वितरीत तरतूदीचा विनियोग करण्याच्या अधीन राहून उपरोक्त तरतूद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. उपरोक्त संदर्भात होणारा खर्च मागणी क्रमांक ई-३, प्रधान लेखाशीर्ष २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१०) क्रीडा प्रशिक्षण केंद्राची आस्थापना, (१०) (०३) जिल्हा क्रीडा प्रशिक्षण केंद्राची स्थापना (२२०४ ५६८२), ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशीर्षाखालील या वर्षाच्या उपलब्ध तरतूदीतून करण्यात यावा.

४. वित्त विभाग दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनानुसार उपरोक्त तरतुद खर्च करण्याबाबतची कार्यवाही करण्यात यावी. यासाठी संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी यांना आंहरण व संवितरण अधिकारी तर आयुक्त, क्रीडा व युवक सेवा यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

५. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दिनांक ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकातील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र.१, २, ३, ४, ५, ६ व ७ मधील बाबी सदर आदेशास लागू नाहीत.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२४१२२११३४३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2019.01.24 12:29:42 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल तथा अध्यक्ष, आंतरविद्यापीठ क्रीडा महोत्सव आयोजन समिती, मुंबई.
२. मा.मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मुंबई.
४. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य यांचे स्वीय सहायक.
५. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
६. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
८. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१ - मुंबई/महाराष्ट्र-२ नागपूर.
९. सर्व उपसंचालक व जिल्हा क्रीडा अधिकारी (संचालनालयामार्फत)
१०. सर्व जिल्हा कोषाधिकारी (संचालनालयामार्फत)
११. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे. (संचालनालयामार्फत)
१२. वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई.
१३. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. निवड नस्ती (क्रीयुसे-१)